छायाचित्र - निखिल पंडित, गुगल

: संपर्क :
ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे – ४००६०४
9869674820

हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी
तसेच सूचना, अभिप्राय
व प्रतिक्रियांसाठी

netaksharee@gmail.com

# क्षितीजाच्या पार

# संपादकीय

सार्‍या जगाच्या पसार्‍याकडे अविरतपणे लक्ष ठेवणारं, मायेन राखण करणार आभाळ जेव्हा थकुन जात असेल, दिपुन जात असेल, अचंभीत होत असेल आणी शोधत असेल अशी जागा जिथे त्याला थोडा वेळ टेकता येईल आणी मांडता येतील या जिवसृष्टीच्या अनोख्या गोष्टी, त्यांची सुख दु;ख, गमती जमती, त्यांचे उत्सव, त्यांचा जल्लोष तर कधी भयाणता सुद्‌धा, सार काही. आपल गजबजलेल मन कुठेतरी मोकळ कराव अस त्याला वाटत असेल आणी आपोआप त्याची पाऊल वळत असतील त्या स्थितप्रज्ञाकडे, जो नेहमी असतो त्याच्या सोबत, त्याची वाट बघत आणी नेहमी आसुसलेला त्याला कवेत घ्यायला. ही ओढ नक्कीच दोन्हीकडुन असणार नाहीतर त्यांच्या या अभुतपुर्व मिलनाचा सोहळा बघणार्‍या प्रत्येकाला त्यांनी अनुभवलेल्या  काही उत्कट क्षणांची आठवण आल्याशिवाय राहीलीच नसती.

त्यांच्या काय गुजगोष्टी चालत असतील माहीत नाही,  कदाचीत आभाळ कधी मांडत असेल कोण्या एका उधवस्त शहराची कथा तर कधी विविध रंगाने माखलेल्या, सुगंधी फुलांनी सजलेल्या कोण्या एका नगरीची उत्सवगाथा, मग एक दिर्घ उसासा टाकुन तो स्थितप्रज्ञ आभाळाकडे एक कटाक्ष टाकत सांगत असेल कोण्या एका बेछुट वादळाशी धिटपणे केलेला मुकाबला, कधी ऐण भरात असलेल्या थंडीत कुडकुडत घालवलेल्या रात्री, तर कधी त्याच वार्‍याबरोबर झुलत झुलत व्यतीत केलेल्या अनेक मौन  क्षणांची स्मरणगाथा. की आणखी काही अर्थ असेल त्यांच्या भेटीचा. काय असेल त्यांच्या या अद्‌भुत मिलनाच्या सुर्वणक्षणात आणी त्याच्या ही पार. . . . . . !!!!!!!

नक्की काय असेल. . . . .    क्षितीजाच्या पार. . .!

हा अंक समर्पित आपल्या आयुष्यातील अशाच स्थितप्रज्ञांना, अशा क्षितीजाला आणी क्षितीजाच्या पार दडलेल्या अनेक सुवर्णक्षणांना. . . . . . . . .!

शशिकांत रणवरे (ठाणे)

(Shashi_me.marathi@yahoo.com)



# शुक्राची चांदणी.

शुक्राची चांदणी.
मठात लपून बसलेल्या साधुच्या
चेह-यावर पसरलेल्या चांदण्यात
चंद्र शोधताना
शिशिरातील पानगळीत सापडलेलेले
हिरवे पान तपासत राहीले
तेच जगण्याचे जुने संदर्भ .
डोक्यावर आभाळ ओढून घेण्याचा
केविलवाणा प्रयत्न करणारे
उघडेबोडके दुर्लक्षित खेडे
या सा-यांमध्ये
भिजत पडलेल्या दुःखाची
परिसीमा शोधताना
आयुष्याच्या सीमा दूर गेल्या होत्या
अगदी दूर क्षितीजाच्या पार
अन् दिसत राहीली तीच
धूसर रेषा आणि त्यावर
चमकणारी दिमाखदार
शुक्राची चांदणी.

-अनिल बिहाणी

anilbihani@gmail.com



# क्षितिजाच्याही पल्याड जाऊन

क्षितिजाच्याही पल्याड जाऊन ठसा चिमुकला उमटून ये तू.
चंद्रसूर्य हातावर गोंदून अंतरंगही उजळून ये तू.

चंद्राच्या गाभ्यात जाऊनी बीज कोवळे रुजवून ये तू.
वेचून तारे परडीमध्ये चांदणरात्री तोलून घे तू.

अस्मानी वाटांवर जाऊन गुलाल रंगी माखून जा तू.
मेघांना मग मिठीत घेऊन चिंब होउनी न्हाऊन जा तू.

ऊन होउनी पानावरती पिवळे मोती सांडत जा तू.
गहिवर लेऊन प्राजक्ताचा देठावरती मांडत जा तू.

वाऱ्यावरती झूला बांधुनी हिमशिखरांना चुंबून ये तू.
कोसळताना उल्का होऊन दरीखोऱ्यांना भेटून ये तू.

ओलांडून तो विशाल सागर पिउनी लाटा उसळत जा तू.
वारा होऊन हिरवी कुरणे बेफिकीरीने घुसळत जा तू.

वणवा जळता देहावरती फुंकर घालून शमवत जा तू.
मळभ दाटता पापणीपाशी धरतीवरती बरसत जा तू.

हातावरल्या रेषा खोडून नक्षत्रांशी भांडत जा तू.
पूर्व दिशेला सूर्य होउनी आभाळावर पेटत जा तू.

संचिता कारखानीस.

# क्षितीज

लागेबांधे टाकून मागे
शोधत निघालो एक क्षितीज...
सूर्योदयाचं क्षितीज
तांबट लालसर

जिच्या मांडीवर डोकं ठेऊन
अंमळशाने मिटून घ्यावेत डोळे
निवांत...
अंधाराची शांत निळाई
अंगात भिनेपर्यंत

मग उठावं क्षितीजापासनं
क्षितीजालाच घ्यावं कवेत
मग आखाव्यात नव्या दिशा
आपल्या आपणच
आपल्यासाठी

क्षितीज विचारेल प्रश्न
काय केलंस तू माझ्यासाठी
सूर्य डोईवर आला असताना?

*मी म्हणेन क्षितीजा*
*चांदण्या राती*
*घेऊन हात हाती*
*असं वगैरे चालायला*
*आपण का आता लहान आहोत?*

*दिवसभराची उन्हं सावरून*
*उन्हाच्या पिवळेपणाला*
*सायंकाळी निळाई दावायला*

*भेटूच आपण नेहमी*
*निळाई अंधारत जाताना*
*तांबट लालसर ज्योत*
*शांतावताना*
*कुशीतून कवेत*
*कवेतून कुशीत*
*एकमेकांच्या 'आगोश'में*

*लागेबांधे टाकून मागे*
*सूर्योदयाच्या क्षितीजावर*
*भेटत राहू... आपण*

*आल्हाद महाबळ*

alhad.mahabal@gmail.com



## नकळत

आकाशाच्या प्रतलावर मांडिल्या होत्या काही रेषा
क्षितीज उडुनी गेले पाखरासवे पुसुनी माझ्या रेषा

.....कदाचित तुझ्या माझ्या भेटीच क्षितीज अजून दूर आहे

तळहातावरी तुझ्या नावाच्या शोधिल्या काही रेषा
सुकुनी जायची मेहंदी कवळूनी घेताच तुझ्या रेषा

....कदाचित तुझ्या माझ्या भेटीच क्षितीज अजून दूर आहे

चंद्राने पाण्यात तर सांडिल्या तरंगाच्या काही रेषा
आसवे निरोप देत घळता ओलेत्या पापणीच्या रेषा

....कदाचित तुझ्या माझ्या भेटीच क्षितीज अजून दूर आहे

सावध होत वारा पहातसे कळीच्या कोमल काही रेषा
नाजूक कळीच्या रंगाला चढल्या अनाम गंधाच्या रेषा

.........कदाचित माझ्या नकळत तुझी माझी भेट घडत आहे

.....कविता मोकाशी

kavitamokashi.kavita@gmail.com

# क्षितिजाच्या पार

क्षितिजाच्या पार
अज्ञाताचा वेध घेत
एक अलगुज वाजत राही
अनघड, अनवट वाटांवरले
सूर अनोळखी मी शोधत जाई

क्षितिजाच्या पार
लाल केशरी रंग लाटांवर
ओथंबल्या आभाळाच्या निळाईत
काळ्या करड्या मातीतल्या
माझ्या अस्तित्वखुणा मी शोधत जाई

क्षितिजाच्या पार
शब्दब्रम्हाची लेखनसीमा
नेणिवेच्या तीरावरला
अव्यक्त, अस्फुट जाणीवेचा
अर्थ नेमका मी शोधत जाई

क्षितिजाच्या पार
साकारलेला तो ओंकार
रंग-गंध-स्पर्शा पलीकडल्या
आकार,उकार अन मकारातला
निर्गुण निराकार मी शोधत जाई

सुनीता पिंपरिकर
sunita.pimprikar@idbi.co.in



# वर्तुळ

उगवण्याचा मान दिलास ...
आणि मावळण्याचा घेतलास !...
पण उजळणारं कोण ?...
कधीही पाठ केली नाही ....
पश्चिमेने... पूर्वेकडे !...
नियम पाळत आलोय आपण ...
क्षितिजावर नियम नाहीत !....
काळजात तरी कुठले आलेत नियम !..
पण एक नियम काळीजही पाळत आलंय
ठोके सुरू आहेत निरंतर...
तुझ्या काळजाशी समांतर !...
एका लयीत ... अखंड ...
तू एक अंश कुठेही वळ ....
माझ्या दिशेने... माझ्या विरुद्ध...
ठोका मात्र चुकेलच !...
एक जीवघेणा आणि दुसरा ...
दुसराही जीवघेणाच !....
माझी पूर्व... तुझी पश्चिम...
एक सांगशील ?...
क्षितिजावर दिशा तरी आहेत ना ?
का तिथेही पुन्हा तेच ...
तुझ्यासारखं वर्तुळ !...

**सुधीर ..**

sudhirkavyalay@gmail.com

# पायांखालचा रस्ता

मी पुन्हा पुन्हा उचलतो पाय,
पुन्हा पुन्हा मांडून बघतो डाव.
काय सांगावं ... कधी ....कसा ....
पण कधीतरी नक्की रंगात येईल हा खेळ
......या आशेवरच
मी पुन्हा पुन्हा उचलतो पाय.

मी थकत नाही
चालून चालून ...
माझ्या ओठांवरले शब्द
संपत नाहीत अवेळी ...
भरत नाही कधीच
भरल्या ओंजळीतली पोकळी

मी अधूनमधून
माझे खिशे चाचपतो,
.... श्वास मोजतो,
..... नाडी तपासतो,
.... आभाळ बघतो.

आणि अशा पानगळीत
शिरीषाची पानं
झेलत बसतो अंगावर
एखाद्या संध्याकाळी,
मला माहित आहे ...
तो फुलणार आहे
थोड्याच दिवसात...
कुठल्यातरी वेळी.

“नको घाई,
घाई नको ...
मवाळ मजकुराला
रक्ताची शाई नको ”

मी बजावतो माझ्याच पायांना
अगदी पुन्हा पुन्हा ...

मी पुन्हा उचलतो पाय ....
हा पायांखालचा रस्ता
क्षितिजाच्या पार कुठेतरी संपतो
... असं मी ऐकलंय फक्त.
त्याच्या अंतापर्यंत चालत जावूनच
मला संपूर्ण विश्रांती घ्यायचीय खरंतर....

पण खंत आहे ती इतकीच
की मी अद्याप क्षितिजही गाठू शकलो नाही.

- गजानन मुळे

Mulegajanan57@gmail.com

साहित्य प्रतिष्ठान

ई अक्षरी

# माझ्यासाठी!



कृष्णास.....राधेकडून
जातोस?
जा.
पण....
कुंद वेळी
जेव्हा आकाश काळ्याभोर ढगांनी भरून येईल,
वारा बेभान वाहू लागेल,
रोमांच असह्य झाल्याने मोर वेडा नाचू लागेल,
कोसळत्या धारांनी दिसेनासं होईल ते क्षितिजही...
तेव्हा तुझ्या डोळ्यातले दोन थेंब
नक्की राखून ठेव माझ्यासाठी!

जातोस?
जा.
पण...
सूर्यबिंब अस्ताला टेकल्यावर
आकाश जेव्हा रंगांचं काहूर उठवेल
वा-याच्या झुळुकीमुळे
जेव्हा ऐकू येईनासे होतील मारव्याचे सूरही
तेव्हा त्या अव्यक्त कवितेतले दोनच शब्द
नक्की राखून ठेव माझ्यासाठी!

जातोस?
जा.
पण...
प्रलयाच्या वेळी सारी भूमी जेव्हा लाल-केशरी ज्वाळांनी भरून
जाईल,
आणि आसमंत काळ्या कभिन्न धुरानी...
तेव्हा
व्याधानी वेध घेतलेल्या तुझ्या तळव्यावरले
दोनच रक्ताचे थेंब
नक्की राखून ठेव माझ्यासाठी!!!

----आसावरी गुपचुप

नेटाक्षरीचा हा अंक तुम्हाला कसा वाटला ? एकूणच हा उपक्रम तुम्हाला आवडला का ? मग तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानबद्दल जाणून घ्यायला नक्कीच आवडेल.

२००८ मध्ये स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना जवळ जवळ दोनशे दर्जेदार मराठी ई पुस्तके / ई नियतकालिके विनामूल्य दिली आहेत. मोरया, मीरा, कृष्णा, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वा. विवेकानंद, विंदा करंदिकर, ना धों महानोर, ग्रेस , नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे चारशे नवीन साहित्यिकांना या व्यासपीठावरून सादर केले. आमचा प्रत्येक अंक, आमचे प्रत्येक पुस्तक ई मेलच्या माध्यमातून साधारणतः सव्वालाख मराठी वाचकांपर्यंत जातो. जगभरात पसरलेल्या पण मनाने महाराष्ट्रातच असणार्या प्रत्येक वाचकापर्यंत जाण्याचा आमचा प्रयत्न आहे. आम्ही इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. प्रेम आणि सौंदर्याबरोबरच विद्यार्थी आणि शेतकर्यांच्या आत्महत्या, दहशतवाद, प्रेमभंगातून येणारी निराशा, बालमजूर अशा ज्वलंत विषयांवरचं साहित्य मांडलं. विनोदाला वाहिलेलं ई श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीताची समज तरुणांत वाढण्यासाठी संगीत कानसेनचे ई वर्ग चालवले. नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. नवीन साहित्यिकांचा शोध घेण्यासाठी अक्षर अंकुरची मोहीम चालवली. तर महाराष्ट्रातल्या किल्ल्यांची माहिती देणार्या पुस्तिकांच्या "दुर्ग दुर्गट भारी" या मालिकेद्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगभरातल्या मराठी मंडळींना मराठमोळ्या इतिहासाची उभारी दिली. लवकरच आमचा ई-यत्ता हा ज्ञानवेध घेणारा उपक्रम सुरू होईल. मराठीचं वैभव जे ज्ञानदेव तुकाराम. अशा संतांच्या पुस्तिकांची एक मालिका आपल्या भेटीला येते आहे. केवळ कविताच नव्हे तर कथा कादंबर्या आणि गंभीर विषयांवरची पुस्तकेही आपल्याला इथे मिळतील. तर तरुणांमध्ये नव्या जगाला सामोरं जाण्याची हिंमत जागवणारं "उनाड" आपल्या भेटीला आलं.

तुम्हाला हे ई अंक आवडले तर आपल्या मित्रांना फ़ॉर्वर्ड करा. तुमचे अभिप्राय कळवत रहा.

वरील सर्व ई-पुस्तके विनामुल्य मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता संपर्क : esahity@gmail.com

नेटाक्षरीचे अंक नियमीत मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता संपर्क : netaksharee@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान

नेटाक्षरी